# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे

सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड

## संपादकीय

सौष्ठवचा हा पाचवा अंक. इथे '-----' अशी बिननावाची साहित्यकृती आम्ही देत आहोत. ज्यांना परंपरेतील वाङ्मय प्रकार आणि त्यांची शुद्धता मान्य असेल त्यांना ही साहित्यकृती पसंत पडणार नाही. कारण कविता, नाटक आणि कथा या तिन्ही वाङ्मय प्रकारांची शुद्धत्व मोडीत काढणारी मराठीतील ही पहिलीच साहित्यकृती आहे. भविष्यात अशा साहित्यकृती अधिकाधिक जन्मत जातील.

कविता आणि गद्य यांचा मिलाफ तर यापूर्वीच काही साहित्यकृतीत अंशत: येऊन गेला आहे. या साहित्यकृती बरोबरच नितीन कुलकर्णी 'निवी' आणि प्रवीण दामले यांच्या कविता आम्ही येथे देत आहोत.

अरूण कोलटकर यांच्या कवितांच्या पुढे जाणारी कविता लिहीण्याचा प्रामाणिक प्रयत्न 'निवी' करतात. भविष्यात त्यांची वाटचाल कशी होते हा औत्सुक्याचा विषय आहे.

---

## '------------'

श्रीधर तिळवे

।।१।।

यम आनी यमी दोघबी भैनभाऊ तशी दोघबी येकदम फिट्ट म्हंजे बॉडीनं बर का? आपल्या भावाला बघुनशान यमीच्या मनात वंगाळ आलं. तिच्या मनातला सेक्स जागा झालो (समद्यांचं असं मत न्हाय, काई म्हंत्यात स्तनातला तर काई तनातला) पर भावाला नुस्ता सेक्सच करायचाय असं कसं म्हननार तवा त्या काळात कंडोमबी नव्हता नव्हं. त्यामुळं बॉडीला बॉडी भिडली की तिसरी बॉडी तयार. येकदम पार्सल. तवा यमी जरा डिप्लामेटकली म्हन्ली, 'यमा माज्या राजा, मला तुज्यापासून प्यार हवं,' सेक्स हवा असं डायरेक्ट कसं म्हंनार? बाईमानूस! त्यात समोर ह्यो यम. तवा सेक्स हवा नायी आनी जागी बदनमे ज्वाला पन नाई. यमानं पुढं काय व्हनार ते वळाकलं. पोरं सांबाळायची म्हंजी काय साधी बात हाय? त्येचं शिक्शान! आश्रमात ॲडमिशन! पन्नास भानगडी. त्यातच ही यमी आपली हाडामासाची भैन. त्यो म्हनला, 'यमे आपन दोगंबी भैनभौ तवा ये मागनं वर नायं.' यमी रडू लागली, 'पर मला प्यार हवं' तवा यमाला सुचनां काय करायचं मग त्येच्या डोक्यात येक शाळा आली. त्यानं हान्ली एक कविता. कविता आयकून यमीचं भैनपन जाग झालं आनि तीनं मागनं सोडलं. ही अशी ताकत कवितेची. तवापासून हिन्दी फिल्मवाल्यानी गानं उचललं आनि टाकलं यमीच्या त्वांडात, 'भैय्या मेरे राखी के बंधनको निभाना' तर सांगायचा पॉईंट काय कवितेची ताकद लय मोठ्ठी

।।२।।

नात्याच्या निरागस घरांना
कुठून वाळवी लागते
नका विचारू
हुमायूनच्या कुठल्या मनगटांतून वाहते
त्याच्या बहिणीची नस
नका विचारू
जुळ्या बहिण भावांच्या कुठल्या संभोगातून फुलते
गर्भाशयात निष्पाप मूल
नका विचारू
मला खरचं काही माहीत नाही
मला इतकच कळतं
कुठल्याही राखी पौर्णिमेला
मला राखी बांधण्यासाठी एखादा हात आला
की माझे दोन्ही हात
कोपऱ्यापासून गळून पडतात.

।।३।।

ती म्हणाली, 'काय म्हणालास ते समजलं नाही. खरं तर मुक्तछंद समजतच नाही ऐकतानाही कंटाळा येतो ना ताल ना आघात.'

मग मी गप्प राहिलो. ज्या बाईला मुक्तछंद कळत नाही तिला विसाव्या शतकात जगण्याचा हक्क काय आणि जगण्याचा हक्क असलाच तर कवीशी मैत्री करण्याचा हक्क काय.

ती पुटपुटली, 'तुझे विचार व्हायोलंट आहेत. त्यातून तुझा शॅबोनिझम दिसतो. असा विचार करण्यापेक्षा मुक्तछंद सोडून दे. व्हायोलन्स देखील त्याच्याबरोबरच सुटेल.'

।।४।।

निरागस घरात नात्याच्या

कुठून लागते ही वाळवी
कुठली ब्ल्यू फिल्म घेऊन रक्तात
बहीण देखील संभोग चाळवी

हुमायूनच्या मनगटामधली
कशी नासते बहिणीची नस
गर्भाशयाच्या समान घरात
राहून देखील होतो पल्स

तू तर समोर सतत कपड्यात
तरी दिसतेस कशी नागडी
तुझे स्तन दिसत नाहीत
डोळ्यांची वाट होते वाकडी

राखी धरून तुझी बोटे
पौर्णिमेला येतात घेऊन
माझे हात कोपऱ्यापासून
फोनपाशी पडतात गळून

।।५।।

बायबलमध्ये एक कथा आहे ॲडम आणि ईव्हची

साधीच होती तशी
तिची माझी कहाणी
काही शब्द माझे
काही तिची गाणी

साधीच होती बाग
साधीच होती वाणी
झाडाला देऊन गेले
सर्प हिरवे पाणी

हिंडताना झाडाखाली
इतकेच फक्त जाहले
मी ॲडम होईन म्हणूनी
फळ तिने लपवले

लपवण्यात तर साराच गोंधळ. उत्सुकता ताणली जाते. दोघांनी फळ खाल्ले आणि दोघेही सरळ पृथ्वीवर आले.

आता मुद्दा असा की ॲडम आणि ईव्ह जर आदिम जोडपे असेल तर त्यांच्या मुलामुलींनी आपण बहीण भाऊ हे न कळून किंवा कळून आपापसात सगळंच केलं असणार. म्हंजे त्यांच्यापैकी कुणाला यमासारखी कविता येत नसणार म्हणजे फर्स्ट जनरेशनच्या पापाची सुरूवात ज्ञानापोटी तर दुसऱ्या जनरेशनच्या पापाची सुरूवात बहिणीशिवाय भावाशिवाय इतर पर्याय नाही म्हणून सक्ती म्हणून. ह्यावरून दिसते ते असे की ज्ञान स्वत: बरोबर सक्तीही घेऊन येते.

।।६।।

मला दोन सख्ख्या बहिणी
म्हणतो त्यांना दीदी विजू
त्यांच्यासमोर शुद्ध राहतो
कसा माझा अवघा काजू

तुझ्यावेळीच का नेमके
टिव्हीत बुडते माझे गात्र
तू सख्खी नाही म्हणून
का फुटते माझे पात्र

सख्ख्या आहेत त्यांच्यासाठी
आयुष्य जाळण्यास देह तयार
तू येतेस तेव्हा मात्र
ब्ल्यू फिल्म मध्ये होतो ठार

।।७।।

F.R.I. - 169 चौकशी करता असं कळाले की कवीला दोन सख्ख्या बहिणी आहेत आणि त्यांचे नाते शुद्ध आणि पवित्र आहे. ह्याचा अर्थ ही कविता आत्मचरित्रात्मक नाही. कवीच्या बहिणींना कवी दीदी किंवा विजया असे काहीही म्हणत नाही. त्यांची नावे वेगळीच आहेत. तेव्हा कवी निर्दोष आहे. कवितेतील बहिण सख्खी नाही, मानलेली आहे.

।।८।।

कवीने कल्पनेने लिहावे का? कविता हा सेल्फ एक्सप्रेशनचा प्रकार असताना कवीने असा कल्पनाविलास का करावा?

।।९।।

हरेक रात्री लेटनाईट शो
स्वत:मध्ये घायाळ झडतो
मला आधार देताना का
तुझा पदर खाली पडतो
का चुंबतेस माझे कपाळ
ओठापाशीच कशी थांबतेस?
मी जेवढा जवळ ओढतो
तेवढी का तू देहात लांबतेस?
कोण थांबवते तुला आतून
असतेस बहिण की प्रेयसी
तळ्यात मळ्यात मळ्यात तळ्यात
आयुष्याची करतेस काशी

।।१०।।

कविता वाचून एकाला देशात पसरत असलेल्या पोर्नो साहित्याच्या प्रसाराची कल्पना आली त्याच्या लक्षात आले की कवी अतिशय सिरियस आहे तो आपणाला सावध करण्यासाठी नवी तुतारी फुंकत आहे त्याने

लिहीले

पश्चिमेकडून आली ब्ल्यू फिल्म
पूर्वेकडून खजूराहो गेले
ईस्ट ॲण्ड वेस्ट व्हेन मिट ईच आदर
बहिणी मेल्या भाऊही मेले

एकविसाव्या शतकात काय घडू शकेल त्याचा हा अंदाज आहे संस्कृतिरक्षकांनो, आपण वेळीच सावध राहायला हवे हाच ह्या कवितेचा मेसेज आहे.

||११||

आहेस कोण तू माझी बहीण
माझी प्रेयसी माझी मैत्रीण
तिन्ही वर्तुळात फिरत माझे
आयुष्य अवघे करतेस दीन

इथून पाहता तिथे दिसतेस
इथे उतरता तिथे असतेस
प्रेम करतो द्वेष करतो
मला फसवतेस स्वत:ही फसतेस

||१२||

किती कथा सांगू माझ्या परवडीच्या
आत्मवंचनेच्या किती घोर प्रत्यंचा ताणून दाखवू
माझ्याजवळ धनुष्य असले
की तिच्याजवळ भाता नसतो
तिच्याजवळ धनुष्य असले
की माझ्याजवळ भाता नसतो
ह्यामुळेच तिने एक पाऊल टाकले की
दोन पाऊल रस्ता मागे सरकतो
आणि आम्ही काही बोलण्यापूर्वीच
मैलाचे दगड
नाहीसे झालेले असतात

||१३||

संस्कृतिचा भगवा रंग
ब्ल्यू फिल्मचा निळा रंग
काळा निळा काळी निळी
तरी त्यांच्यात भगवा रंग

एकीकडे बांधतेस राखी
दुसरीकडे संभोग आव्हान
माझ्यासमोरच कसे येते
देहास तुझ्या निळे न्हाण

देहामध्ये तुझ्या उभे
तुझी आई तुझा बाप
त्यांच्यासमोर का काढतेस
ईडनमधला गुणी साप
यायचं असेल तर सरळ ये ना. ही नाटकं कशाला करतेस?
ये कायमची फेकून कपडे
नागडी होऊन हो काकडी
देहामध्ये सरळ होते
देहाबाहेरची वाट वाकडी

||१४||

ह्या कवितेतील काळा कोण, काळी कोण. कृष्ण काळा होता द्रौपदी काळी होती आणि त्यांचे संबंध गूढ होते. कवीने संग असा शब्द वापरलाय खरा पण पुढे भगवा असे विशेषण लावून ह्या संबंधातला पवित्रपणा आणि आध्यात्मिकता सूचीत केलीये. कवीच्या प्रत्यक्ष भेटीत त्याला विचारले असता तो म्हणाला की त्याच्या आसपासच्या दोन घरात जे घडतय ते त्याने मांडले आहे. त्यातील निवेदक म्हणजे कवी नाही तर ह्या दोन घरातील पुरूष आहेत. त्यांच्या मनाचा संज्ञाप्रवाह पकडण्याचा त्याचा हा प्रामाणिक प्रयत्न आहे. कवी ह्या कवितेतून समाजाला सावध राहण्याचा मेसेज देतोय हा अंदाज आमचा खरा ठरल्याचे पाहून आम्हाला आमच्या बुद्धीचे सार्थक वाटले.

||१५||

पडदा उघडतो. रंगमंचावर एक स्पॉट. स्पॉटमध्ये एक तरूण एक तरूणी. प्रथम आवेशात आलेला तरूण बहुधा आता प्रत्यक्ष कृती करायची वेळ येताच गळून गेलाय ती मात्र आवेशात आलेली. ती त्याला बेडपर्यंत घेऊन जाते. तो बेडवर बसतो मग ती बसते.

तो : सेक्स म्हणजे काय?

ती : करून झाल्यावर सांगते.

दोघं सेक्स करतात. तो प्रथम दबलेला मग खुलतो. सेक्स संपतो. दोघं आवरतात.

ती : आता मी सांगते सेक्स म्हणजे काय?

तो : जे कृतीने कळाले ते चिन्हात वळोन फायदा काय?

तो मग शब्दासारखा वळतो एक्झीट घेतो. तिला मात्र बोलण्याची प्रचंड उबळ आलीये.

ती : करायची पण सक्ती आहे. आणि केल्यानंतर बोलायची पण सक्ती आहे

मग ती उभी राहते. प्रेक्षकांसमोर येते.

ती : काय केले ते बोलू का?

प्रेक्षक : पाहायची पण सक्ती आहे. ऐकायची पण सक्ती आहे.

ती जे वीस मिनिटात केले त्याच्यावर तीन तास बोलते आणि पडदा पडतो.

||१६||

सक्ती करणाऱ्या सर्व ब्ल्यू फिल्मचा, उत्तान हिंदी चित्रपटांचा व सिरीयल्सचा निषेध असो.

||१७||

माझी सारी पिळवणूक माहीत असताना
का छळते ती मला
का आणते माझ्यासमोर
सुबक राखीचे दांभीक गोंडे
तिला नेमके काय साधायचे असते
स्त्री लंपट मी
की पुरुषलंपट ती
खरंतर कोणत्याही संबंधांकडे पाहाताना
नर आणि मादी एवढंच शिल्लक राहायला हवं
हे पटतं मला
पणं प्रत्यक्षात तसं होत नाही
मुली येतात त्या नेहमीच काहीतरी बनून
आई
बहीण
मैत्रीण
प्रेयसी
निखळ मादी म्हणून भिडतानाही
त्यांच्या स्तनांना केव्हा दूध फुटेल
सांगता येत नाही
त्यामुळेच संभोग करताना मी विषण्ण असतो
माझ्या अवस्थेचं नेमकं लक्षणही सापडत नाही मला
आणि मी मग
वेड्याच्या इस्पितळात जाऊन
स्वत:च्याच अंगावरचे कपडे फाडत राहतो

||१८||

यमाला कविता येत होती म्हणून त्याने यमीला कविता म्हणून तिच्यातील बहिणपण जागे केले. निवेदकाला कविता येत असूनही तो मात्र अयशस्वी झाला. आम्ही विचारले असे का? तर आकाशवाणी झाली, 'कारण त्याचा सामना दूरचित्रवाणीशी होता'

||१९||

आज आठ वर्षांनी
पुन्हा एक हात माझ्या दिशेने सरकलाय
माझ्यासमोर तीन मुली उभ्या आहेत
एक बहिण
एक प्रेयसी
एक मैत्रीण
त्यातील ही कोण हे मला माहीत नाही
मला इतकेच कळते आहे
कि माझे दोन्ही हात
तिच्या पायापाशी गळून पडलेत
आणि तिच्या कपाळावर
माझ्या रक्ताचा लालभडक सडा आहे

||२०||

नेमक्या आठ वर्षांनीच तीन मुली का उभ्या ह्याची चौकशी करता अ कळाले की आठ हा आकडा शनीच्या प्रभावाखाली आहे. शनी दु:खदाय आहे. म्हणून निवेदकात आणि त्या मुलीत जे काही घडेल हे दु:खदायक असेल

||२१||

जवळ येतो जातो दूर
दूर जातो जवळ येतो
पाण्यास जेव्हा तहान लागते
देहाची तुझ्या वाळू पितो

देहात कुठून आहे उगवत
नात्यांची ही वीण तल्लख
मी नर आणि तू मादी
एवढेच जर आहे शिल्लक

टिव्हीपूर्वी होतीस बहीण
टिव्हीनंतर झालीस मादी
मॉनिटरवर राहून केलीस
आयुष्याची ओली गादी

पश्चाताप आणि तुझा मोह
दुभंगून जातो अवघा जीव
कोणत्या क्षणी दुवळी झाली
संस्काराची बळकट शीव

बहिणीपासून मादीपर्यंत
तुझा झाला प्रवास कसा
कसा सोडला चक्रधराने
पापाचा हा शुभ्र ससा

रात्र रात्र सुन्न असंते
नासून जाते सारी मजा
लिंग फाडीत देहामध्ये
नात्यांची मी भोगतो सजा

||२२||

आईच्या अंगावर कपडे असतात म्हणून आई आई असते
बहिणीच्या अंगावर कपडे असतात म्हणून बहीण बहीण असते
आई आई बहीण बहीण असते म्हणून संस्कृती संस्कृती म्हणून जन्म घेऊ शकते
संस्कृती संस्कृती म्हणून जन्म घेऊ शकते म्हणून भाषा भाषा असते कविता कविता म्हणून जन्म घेऊ शकते
थोडक्यात कवितेचे मूळ आपल्या कपड्यात आहे.

# प्रवीण दामलेच्या कविता



परवा जो माणूस
माझ्या देशात बेवारस मेला त्याच्या स्मरणार्थ
हा वाडगा मी इथे बांधतो आहे. दगडात कोरून.
परवा जो कोणी
माझ्या राज्यात उपाशी मरायला टपला होता
त्याच्या त्या राजकीय युद्धखर्चाच्या भागवणीसाठी
मी माझे महावस्त्र गहाण टाकीत आहे
परवा जो कोणी
खरोखरीच मरायला निघाला होता
त्याच्यासाठी मी माझी त्वचा काढून द्यायचे ठरवले आहे.
परवा जो कोणी
माझ्या देशात अपचनाने उलट्या होऊन बेशुद्ध पडला
जो कोणी रक्त पितापिता स्नायूंचा तुकडा घशात अडकून
आतल्या आत तडफडला
परवा जो कोणी
माझ्या मानगुटीवर बसून माझ्याच डोळ्यांनी
सत्तेला डोळा मारत होता
जन्मजात वासनेनं
त्या माणसांसाठी
मी कोणती, कोठे, कशी विहीर खणू?
परवा परवा
जे जे काही घडले
ते विसरता येईल अशी कामायनी निद्रा
या देशासाठी आयात करता येईल काय?



म्हणजे असं की
आपण निराश होतो
की एक साधा माणूस म्हणून म्हणून जगता येत नाही
म्हणजे
हिरवी शाई वापरावी
तर त्यात काळी छटा येतच राहते
म्हणजे रहदारीचा रस्ता ओलांडताना
आपण अडकतो आणि
आपल्याआधी पलिकडे पोहोचलेला
कंटाळून निघून जातो.
म्हणजे
माणसांशी कसं वागायचं याच्या चौकटी
विकत देणारा बाजार आपल्याला माहीतच नसतो
आणि
परवडतही नाही
म्हणजे
आजारी पडता येत नाही,
आजारपणाची रजा घेता येत नाही
आणि
कामही होत नाही
प्रकृती अस्वास्थ्यामुळे.



# नितीन कुलकर्णी 'निवी' च्या कविता



फुटायला एक माध्यम मिळालंय
एक तिजोरी मिळालीय लुटायला
मिळालाय कुटायला एक टाळ
पेटायला जाळ
नाळ, एक कापायला
वळण वळायला

एक अखंड अभंग
कुणाला तरी अनर्थ कळतोय

बहिऱ्या शहरातले
सिद्धांत महा-टोलेजंग
टोपी बरोबर मानही मोडून पडावी
मेंदू गळून पडावेत मागचे मागे
बहिऱ्या शहरात
पेटलीय संभ्रमांची शब्दधुनी
कुणीतरी तिला कविता म्हणतोय
कुणी आणखी काही

आतातर वळणावरच कचरलोत
फुटत नाहीअेत की लुटतही
नाळही भक्कम चालाक
जुन्याशी प्रमाणिक नव्याशी समंजस
अखंड अनर्थाचे असंख्य तुकडे
गाळतायत थेंब थेंब अर्थ
भिजलं लाकूड जळायला नालायक
बहिऱ्या शहरात
कवितेतून अस्पष्ट होत जातोय... कुणीतरी



मोबाईल फोनला पण
ॲन्सरिंग-मशिन बसवायची धडपड चालूय
म्हणजे आता
चहाच्या चोथ्यापासून
खवा बनवायचा प्लांट
टाकलाच पाहिजे

आणखी जमीन घेतलीच पाहिजे
मुंबईला गेलंच पाहिजे राव
भंपकपणाकडून भंपकपणाकडे - भंपकायझेशन
एकविसावं शतक एकवीस मोदक
एकविसावं मादक एकवीस अपेक्षित
२१% व्याज २१० देश
एकवीसशे बक्षिसं एकवीस हजार एकर
एकवीसलाख डॉलर्स एकवीसकोटी प्रमाण

उठ भाड्या होशील जाड्या
ठोक शड्डू हो सामील

पूर्वी एक-दोघांची एक-दोघं जण
एक-दोनदा एक-दोन ठिकाणी मारायचे
एक दोघं हसायचे
सध्या सर्व सर्वांची सर्वदा सर्वत्र मारतात
सर्वच हसतात टाळ्या पिटतात
ग्लोबल गडगडाट ग्लोबल कडकडाट
स्पर्धाय राव! स्पर्धाय!! स्पर्धाय!!!
ॐ स्पर्धाय नम:



पळायला बघतो आकाशाच्या पल्ल्याड
पुलापासचा सिग्नल धरतो थोपवून
जमिनीच्या ब्लँकेटात बघतो मारू दडी
एक इराणी चहा
एक उडपी चहा
एक अमृततुल्य
खोचून ठेवतात तीन ठिकाणी
पीन मारून
दिवसभराच्या यादीत

माझ्या अंगावरचे ऋतू कोणी सोलून नेले?
कोणी चिवडल्या माझ्या कवितेच्या ओळी
एखाद्या, संशयिताच्या घराच्या झडतीसारख्या?

कचरुन कचरुन कचरा झालाय चेहरा
पोटात पोल्यूशन

'ओठांवरच्या शिव्या गिळल्यामुळे असेल'
वांड मनाची समजून घालून
मौनाच्या वाळवंटात परत येतो
हे असं ते तसं म्हणून ते असं हे तसं

मन वाहवतं तशा कविता
बिरेक लाव भौ, बिरेक



सौजन्याचे आसूर
शंकांच्या शूर्पणखा तर्कांचे तिर्किटधा
गेल्या दिवसांची बुजगावणी
अपरात्रींचे बागुलबुवे
नाही शकत मी कोंबू
माझ्या कवितेला कोणाच्या सोयीसाठी
नाही माझी कविता कुणाच्या सोयींमध्ये
चापुनचोपुन झोकुन घोकुन बिकुन झुकून
ॲटेटाईम साताठ कवितांना
लागतो मजल दरमजल
लावतो भोगांच्या भेगांत
पेरतो मोक्याच्या जागी तीळ
पेलतो भाषेची मेघडंबरी
परंपरांची अवडंबरं
वाहत ओझी त्यांची
वळतो आकारांतून नकारांकडे
चकार नसतो कवितेचा
काढतो समजूत एका सांत्वनाच्या चालीवर
ढालीवर वारांची दाटी
एक दमछाक दालन विटंबनांचं

शरमिंद्या शहरात गोंधळतो वर्तुळाकार
मंदावतो अष्टकोनी ठेचाळुन षट्कोनात
चौकानात गुदमर्तो किंचाळतो
विस्कटून सुखावतो त्रिकोणात
स्थिरावतो चेहऱ्यातून प्रतिबिंबात
एक थेंबात ... शाईच्या



कवितेच्या अरण्यात
अधिक ओसाड ओसाड
विसरत चालतो
माझे पूर्वार्ध नाव
गाव ठाव पुसून
असण्याची रेषा डॉटेड लाईन
दोन जगण्यांमधे एक मरण
दोन मरणांमध्ये थेंबभर जगणं

सगळे इगो अपमान आढेवेढे
तर्क खटके पर्याय
घरी ठेवून
रस्त्याच्या डाव्याच्या डाव्याच्या
डाव्या बाजूनं तीसनी
खोटी अंगठी खोटं घड्याळ
स्वत:ला खोटं होता येत नाही

मधेच कुणाचा तरी ळळा
कुणीतरी ठसतो
कुठेतरी ठसठसत राहतो
तत्वज्ञान उपसतो लेख पितो
आवेगतो कागदावर
पुन्हा कोमेजतो कवितेत
कविताकवितांचा माणूस
माणसामाणसांची कविता
'आदमी कभ्भी भी कवितासे अुंचाच'

रात्रीच्या जांभईत शिरताना
डोळ्यांच्या चिंध्यांनी बघू पाहातो आकाश
वाळू भरल्या कानांनी
ऐकू पाहातो गाणी

आता सकाळी
एक नवा दिवस फुटलेला बातमीसारखाच
बातमी बरोबर न बोलावताच
रस्ता दाराशी आलेला

ज्या क्रमानं अुतरवले असतात
बरोबर विरुद्ध क्रमानं कपडे घालतो
नतमस्तक
रिक्तमस्तक
फक्त पावलं
जाग्रुक हेल्मेट बूट
चालू लागतो



# भारतीय शिक्षणव्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न

## भाग - ४

श्रीधर तिळवे

अद्वैती कलात उन्नयन सर्वाधिक असते. ते युग्मीय, विशिष्टाद्वैती आणि द्वैती असे ओसरत जाते. भाषेचे सर्वाधिक उन्नयन काव्यात असते. किंबहुना कविता म्हणजे भाषेने घेतलेली झेप असते. त्याखालोखाल कादंबरी, कथा, लघुनिबंध. त्याखालोखाल नाटकात (म्हणजे नाटकाच्या शब्दसंहितेत) आणि निबंध व चरित्रात हे उन्नयन सर्वात कमी असते. थोडक्यात, कुठलीही कला ही मानवी जीवनातीन ध्वनी, सौष्ठव, देहसौष्ठव, घटना आणि अर्थ यांचे चिन्हीय उन्नयन असते. मानव जशी खुर्ची, टेपरेकॉर्डर ह्या वस्तू निर्माण करतो तसा अर्थ निर्माण करतो. मानवाची लिपी ही तर सौष्ठवचिन्हच असते आणि त्यातून अर्थ निर्माण होतो. किंवा शब्दोच्चार हे ध्वनीचिन्हच असते आणि त्यातूनही अर्थ निर्माण होतो. तेव्हा अर्थालाही ध्वनी आणि सौष्ठव यापासून पळून जाता येत नाही. मात्र भाषेत अर्थ महत्त्वाचा असतो. जोपर्यंत ध्वनींचा समूह किंवा सौष्ठवांचा समूह आशय निर्माण करत नाही तोपर्यंत त्याला आपण भाषा म्हणत नाही. (व्याकरणाच्या भाषेत वाक्य म्हणत नाही.) आपल्याकडे अर्थाची इतकी वाईट सवय झाली आहे की, लोक चित्रकलेत, शिल्पकलेत, संगीतातही अर्थ शोधत बसतात. वास्तविक हा शुध्द गाढवपणा आहे. संगीत हा ध्वनीचिन्हाचा अनुभव असतो. चित्रशिल्प हा सौष्ठवचिन्हाचाअनुभव असतो. अभिनय हा देहसौष्ठवचिन्हांचा अनुभव असतो. घटनाकला हा घटनांचिन्हांचा अनुभव असतो. यातील घटनाकलांना मी संमिश्र कला म्हणतो तर संगीत शिल्प,चित्र, साहित्य, अभिनय (नृत्य व मुकाभिनय) या शुध्द कला आहेत. कारण त्या एकेंद्रिय कला आहेत. तर नृत्य, नाटक, घटनापट ह्या बहुइंद्रिय कला आहेत. ह्यातील घटनापट हा ऐंद्रिय अनुभवांचा सर्वात व्यापक विस्तार असल्याने तो अनुभव पातळीवर सर्व व्यापक कला होय. त्याखालोखाल नाटक, नृत्य ह्यांचा क्रमांक लागेल. मात्र ध्यानाच्या पातळीवर संगीत, चित्र, शिल्प ह्या सूक्ष्म कला आहेत. कारण त्या निर्विचार व्हायला जास्त मदत करतात. साहित्य ही अर्थनिर्णयन पातळीवर व्यापक आहे. माझ्या दृष्टीकोनातून कलांचे सर्वश्रेष्ठ प्रयोजन मोक्ष किंवा निर्वाण किंवा कैवल्यप्राप्ती हेच होय. त्यासाठी चित्रपट, नाटक, नृत्य, साहित्य ह्यांनी आपला अनुभव अधिकाधिक व्यापक व सूक्ष्म करायला हवा. मानवी अनुभवविश्वाचा सतत विस्तार हे त्यांचे उद्दिष्ट असले पहिजे, तर संगीत, चित्र, शिल्प ह्या कलांनी अधिकाधिक शुध्द होण्याचा प्रयत्न करायला हवा. जो संगीतकार मला अजून शुध्द धैवत किंवा शुध्द पंचम वगैरे सापडलेला नाही म्हणतो व असे शुध्द स्वर शोधत जातो त्यासाठी रियाज करून करून सूर, श्रुती सतत तासत जातो तोच खरा संगीतकार होय. हीच गोष्ट चित्रशिल्पाबाबत! जगातील सौष्ठवांची शुध्द मांडणी शोधण्याचा सततचा ध्यास चित्रकार व शिल्पकारांना असला पाहिजे. साहित्यकाराने सतत मानवी मन व बुध्दी ह्यांनी वस्तूंच्या लावलेल्या अर्थांचे सूक्ष्म व स्थूल, व्यापक व खोल असे अर्थ शोधत गेले पाहिजे. विज्ञान व शोध निर्भाव होऊन घेते. वस्तूंच्या अर्थाचे निर्भावात्मक (त्यामुळेच व्यक्तिनिरपेक्ष) निर्णय हा विज्ञानाचा महत्त्वाचा भाग. त्यानंतर विज्ञान त्या वस्तूंचे सौष्ठव व ध्वनीरूप हवे तसे रुपांतरित करणे ह्या तंत्रज्ञानात्मक भागाकडे वळते. साहित्य वस्तूंच्या अर्थाचे सभावात्मक निर्णयन करते. या दोन्ही प्रकारचे अर्थनिर्णयन हेच भाषेचे कार्य होय. व्यवहारात हे अर्थनिर्णयन सतत चाललेले असते. ह्यातून भाषा (१) शास्त्रीय व व्यक्तिगत ज्ञानाची देवाणघेवाण (२) व्यक्तिगत अनुभवांची देवाणघेवाण अशी दोन्ही कार्ये पार पाडत असते. भूतकालीन ज्ञानाचे व अनुभवांचे संचित वर्तमानकालीन ज्ञान व अनुभव आणि भविष्यकालीन ज्ञानाच्या व अनुभवांच्या संभाव्यता ह्या तीन पातळ्यांवर भाषेचा हा व्यवहार चालतो. भाषेत अनुभव हा अर्थातच अर्थयुक्त असतो हे ध्यानात घेतले पाहिजे. चित्रातला रंग हा प्रत्यक्ष अर्थातीत असतो. भाषेत जेव्हा पिवळा हा शब्द येतो तेव्हा पिवळ्या रंगाचा तो अनुभव नसतो तर पिवळ्या रंगाचे ते अर्थनिर्णयन असते. थोडक्यात, अनुभवातला पिवळा रंग चित्रकलेत भावनिर्णयन ठरतो, तर भाषेत तो अर्थनिर्णयन यांनी युक्त असतो. भाषेची व्यवहारिक पातळी ही बहुधा वर्तमानकालीन प्रत्यक्ष घटना असते, तर साहित्यात किंवा वर्तमानपत्रासारख्या भाषिक साधनात भाषेची पातळी ही बहुधा भूतकालीन किंवा भविष्यकालीन असते. काव्यातील वर्तमान हा कधीच प्रत्यक्ष नसतो. तो अनुमानात्मक वर्तमान असतो. मी जातो. आम्ही करतो. ही विधाने प्रत्यक्ष वर्तमानकाळ नसून तो वर्तमानविषयी काढलेला निष्कर्ष असतो आणि काव्यात वर्तमानाची ही निष्कर्षात्मक अवस्था फारच टोकाची असते.

वरील सर्व विवेचनावरून कुणाला कदाचित असाही आक्षेप घेता येईल की, वस्तू आधी अस्तित्वात असतात आणि अर्थ हा नंतर येतो, तो काहीसा उपरा असतो त्यामुळे सौष्ठव व ध्वनी निर्णयन ह्या गोष्टी अधिक महत्त्वाच्या आहेत. असे विधान करता येणार नाही असे माझे मत आहे. कारण सौष्ठव व ध्वनी ह्या स्वतंत्रपणे अस्तित्वात असतात हे खरे असले तरी मानवापुरते त्यांचे अस्तित्व हे मानवामुळे शक्य होते. सौष्ठवाचे व ध्वनीचे जे रूप मानव भोगतो तेही मानवनिर्मितच असते. ह्याला मी ध्वनीनिर्णयन व सौष्ठव निर्णयन असे म्हटले आहे. माणूस जसे अर्थनिर्णयन करीत असतो तसेच ध्वनिनिर्णयन व सौष्ठवनिर्णयन करीत असतो. आणि प्रत्येक माणसागणिक ध्वनिनिर्णयन व सौष्ठवनिर्णयन बदलत असते. त्यामुळेच ज्या वस्तू मला आवडतील त्या दुसऱ्याला आवडतीलच असे नाही. त्यामुळेच एका चित्राविषयी, शिल्पाविषयी किंवा बंदिशीविषयी

वेगवेगळ्या व्यक्तींचे वेगवेगळे सौष्ठवनिर्णयन वा ध्वनिनिर्णयन होत असते. कारण प्रत्येकाचे संस्कारण (कंडिशनिंग) वेगवेगळे असते. त्यामुळे साहजिकच प्रत्येकाचे ध्वनिसंस्कारण किंवा सौष्ठवसंस्कारण वेगवेगळे असते. तेव्हा वस्तू आधी अस्तित्वात असते आणि ध्वनि निर्णयन, सौष्ठव निर्णयन, अर्थनिर्णयन ह्या गोष्टी नंतरच येत असतात. आता एक गोष्ट मात्र खरी की माणूस प्रथम सौष्ठवभाषा, ध्वनिभाषा शिकतो आणि मगच अर्थभाषा शिकतो. प्रथम माणसावर सौष्ठवसंस्कारण, ध्वनिसंस्कारण होते आणि मगच अर्थसंस्कारण होते. मग याचा अर्थ सौष्ठवभाषा किंवा ध्वनिभाषा अर्थभाषेपेक्षा श्रेष्ठ म्हणता येईल का? तर त्याचेंही उत्तर नाही असे आहे. कारण मानवाचे जे काही मानव म्हणून वैभव आहे ते अर्थभाषेमुळेच शक्य आहे. वस्तूच्यानंतर प्रथम सौष्ठवभाषा व ध्वनिभाषा हे खरे असले तरी आणि त्यानंतरच अर्थभाषा अस्तित्वात येते हे खरे असले तरी सौष्ठवभाषेनंतर व ध्वनिभाषेनंतर फारशा वस्तू अस्तित्वात येत नाहीत. (प्राण्यांकडे सौष्ठवभाषा व ध्वनिभाषा असली तरी त्यातून मानवाप्रमाणे नवीन वस्तू निर्माण करणे त्यांना मानवाइतके साधत नाही.) याउलट मानवाने अर्थभाषा निर्माण करून निसर्गाचा क्रम पूर्ण उलटा केला. वस्तू — सौष्ठवभाषा — ध्वनिभाषा — अर्थभाषा ह्या क्रमानंतर मानवाने अर्थभाषा — ध्वनिसौष्ठवभाषा — वस्तूंची निर्मिती असा क्रम निर्माण केला. त्यामुळे आज इमारती कारखान्यांपासून सुईपर्यंत अनेक मानवनिर्मित वस्तूंनी हे जग व्याप्त झाले आहे. वैश्य व दलित जाणिवेने हा क्रम उलटा करण्याबाबत प्रचंड वेग गाठला आणि म्हणूनच भाषाविज्ञान आणि चिन्हविज्ञान हळूहळू केंद्रस्थानी आले. व्हिटगेंस्टाईनचा - अर्थभाषेत जेवढे व्यक्त होते तेवढेच सत्य माना - हा आग्रह वैश्य जाणिवेचा एक उच्च बिंदू आहे. ब्राम्हण जाणिवेत व क्षत्रिय जाणिवेत ध्वनिसौष्ठव भाषेचे महत्त्व ढळले नव्हते आणि तत्त्वज्ञान म्हणजे भाषाविज्ञानाची एक शाखा बनविण्याचे प्रयत्न झाले. अस्तित्ववादाने व त्यानंतर आलेल्या विसाव्या शतकातील अनेक चित्रकार, शिल्पकार ह्यांच्या फौजांनी विसाव्या शतकात ह्याला शह म्हणून अस्तित्वाच्या ध्वनिसौष्ठवात्मक रुपाला अर्थरूपापेक्षा महत्त्व दिले. फक्त अस्तित्ववाद्यांना आपण काय करतोय हे स्पष्टपणे लक्षात आले नाही. त्यामुळे त्यांनी भाषाविज्ञानाविरूध्द दंड थोपटले नाहीत. खरे तर अस्तित्वाचे सारतत्त्व म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून अस्तित्वाचे अर्थापूर्वीचे रूप होय. ते महत्त्वाचे आहे हे सांगणे हाच अस्तित्ववादाचा प्रयत्न होता; पण अस्तित्ववाद्यांना तशी मांडणी करता आली नाही. थोडक्यात सांगण्याचा मुद्दा इतकाच की, मानवासंदर्भात ध्वनिभाषा व सौष्ठवभाषा व अर्थभाषा या सारख्याच महत्त्वाच्या आहेत. आधुनिक तत्त्वज्ञानाचा अर्थभाषा महत्त्वाचा ठरवण्याचा प्रयत्न अत्यंत चुकीचा आहे. अर्थभाषेने मानवाला ताकद दिली असली तरी ध्वनिभाषा व सौष्ठवभाषा ह्याच त्यामागच्या आधारशीला आहेत हे लक्षात घेतले पाहिजे. शेवटी मानवाने निर्माण केलेली प्रत्येक वस्तू ही निसर्गाच्याच एखाद्या अंशाचे रूपांतर आहे. हे रूपांतर अनेकदा निसर्गापेक्षा प्रभावी असते हे खरे असले तरी त्याचा मूळ आधार निसर्गच असतो हे आपण लक्षात घेतले पाहिजे. अर्थभाषा हे असेच ध्वनिसौष्ठव भाषेचे रूपांतर आहे आणि ही ध्वनिसौष्ठवभाषा केवळ निसर्गातील ध्वनिसौष्ठवामुळेच शक्य झाली आहे.